पवित्र प्रणाली अंतर्गत कामकाज करण्यासाठी संगणकीय प्रणाली (software) विकसित करणाऱ्या संस्थेस ५०% रक्कम अदा करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-०२२३/प्र.क्र.०४/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- ३० मार्च, २०२३.

**वाचा :-**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१८/प्र.क्र.३९७/टीएनटी-१, दि.०७ फेब्रुवारी, २०१९
२. दि.४ फेब्रुवारी, २०२२ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीची बैठक.
३. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आशिका/२०२२/ई-गव्ह./पवित्र/१४३/००७१६, दि. २५ जानेवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ अन्वये "पवित्र प्रणाली" व्दारे राज्यातील सर्व व्यवस्थापनांच्या शाळांमधील शिक्षक निवडीसाठी पारदर्शक पध्दती निश्चित करण्यात आली आहे. सदर प्रणाली NIC, पुणे यांचेकडून विकसित करण्यात आली आहे. तथापि, काही कारणास्तव NIC, पुणे यांचेकडून पवित्र प्रणालीचे काम काढून घेण्यात आले आहे.

संदर्भ क्र.२ अनुसार दि.४.०२.२०२२ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीमध्ये पवित्र प्रणालीतील उर्वरित कामे तातडीने पूर्ण करण्याबाबत आयुक्त, शिक्षण यांना निर्देश देण्यात आले. त्यानुसार "पवित्र प्रणाली" अंतर्गत कामकाज करण्यासाठी संगणकिय प्रणाली (Software) विकसित करण्याकरिता पात्र व अनुभवी सॉफ्टवेअर डेव्हलमेंट कंपनीची शासन तरतूदीनुसार निवड करण्याची कार्यवाही शिक्षण संचालनालयाच्या स्तरावरुन करण्यात आली. या अनुषंगाने संचालनालय स्तरावरुन मे.तलिस्मा कॉर्पोरशन प्रा.लि.बेंगलुरु या संस्थेची निवड करण्यात आली आहे.

आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये प्रस्तुत कंपनीला देय असलेली रक्कम वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने पवित्र

प्रणाली अंतर्गत कामकाज करण्यासाठी संगणकिय प्रणाली (Software) विकसित करुन घेण्याकरिता येणाऱ्या खर्चाची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पवित्र प्रणाली अंतर्गत कामकाज करण्यासाठी संगणकिय प्रणाली (Software) विकसित करुन घेण्याकरिता येणाऱ्या खर्चास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे. तसेच त्यासाठी येणाऱ्या एकुण खर्चापैकी ५० टक्के म्हणजेच रु.४,९९,७३०/- (चार लाख नव्यानव हजार सातशे तीस) एवढ्या खर्चास व सदर रक्कम मे.तलिस्मा कॉर्पोरेशन पा.लि.बेंगलुरु यांना अदा करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०२२-२३ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. सहायक संचालक (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर निधी कोषागारातून आहरीत करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग-२ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०५/व्यय-५, दिनांक २८.०३. २०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३०१८११३४१५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2023.03.30 18:16:09 +05'30'

**(विवेक सपकाळ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

२) प्रधन सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

३) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे

५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.

६) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,महाराष्ट्र, पुणे.

६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.

८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.